मुख्यमंत्री ग्राम सडक योजने अंतर्गत सोलापूर जिल्ह्यातील पॅ.क्र. पॅकेज क्र. ADB-SOL-०९ मधील सांगोला ते केदारवाडी ता. सांगोला या रस्त्याच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.४०७/बांधकाम-४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: १२ मे, २०२३

**वाचा :**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०१९/प्र.क्र.७०/बांधकाम-४, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१९.

२) **मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/६००/२०२३, दिनांक २१ मार्च,२०२३.

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना अंतर्गत सोलापूर जिल्ह्यातील पॅकेज क्र. ADB-SOL-०९ मधील सांगोला ते केदारवाडी ता. सांगोला या रस्त्याच्या कामास ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये रू. ४७०.२९ लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक १६ ऑगस्ट, २०१९ रोजी देण्यात आला आहे.

०१. पॅकेज क्र. ADB-SOL-०९ मधील सांगोला ते केदारवाडी ता. सांगोला, जि. सोलापूर रस्त्याचे प्रत्यक्ष काम करन असतांना मुळ कामाच्या वावात कोणतीही वाढ झाली नसल्याचे नमूद करुन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या मुळ अंदाजपत्रकामध्ये भाववाढ फरक या बाबीसाठीची तरतुद ठेवण्यात आलेली नसल्यामुळे कामावर होणारा एकुण खर्च हा मंजूर प्रशासकीय किंमती पेक्षा ११.२७% जास्तीचा म्हणजेच रु.५२.९८ लक्ष इतका जास्तीचा होत असल्याचे तसेच निविदा अटी व शर्तीनुसार कंत्राटदाराला भावफरक रक्कम अदा करणे आवश्यक असल्याने सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक २१ मार्च, २०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

**शासन निर्णय:**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना अंतर्गत सोलापूर जिल्ह्यातील पॅ.क्र. ADB-SOL-०९ मधील सांगोला ते केदारवाडी ता. सांगोला कामात प्रस्तावनेत नमुद कारणांमुळे किंमतीमध्ये वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे कामाच्या अंतिम किंमतीमध्ये खालील प्रमाणे वाढ होत आहे.

**(रु.लक्ष)**

| पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | प्रशासकिय मान्यता किंमत | स्वीकृत निविदा रक्कम | सुधारीत खर्च | प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा अधिकचा खर्च | प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा जास्तीच्या खर्चाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ADB-SOL-०९ | ADB-SOL-०९ मधील सांगोला ते केदारवाडी ता. सांगोला, जि. सोलापूर | ४७०.२९ | ४७०.६१ | ५२३.२७ | ५२.९८ | ११.२७ |
| **एकुण** | | **४७०.२९** | **४७०.६१** | **५२३.२७** | **५२.९८** | **११.२७** |

०३. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पुर्ण करावयाचे झाल्यास रू.५२३.२७ लक्ष इतका अंतिम खर्च असुन, सदर कामाच्या प्रशासकीय रक्कमेच्या ११.२७ % जास्तीचा म्हणजेच रू.५२.९८ लक्ष जास्तीचा आहे.

०४. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुच्छेद क्र.६ (२७ अ) नुसार सुधारित अंदाजपत्रकातील अधिक्य सुरूवातीस मंजुर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५% पेक्षा कमी असल्याने शासन स्तरावर मुख्यमंत्री ग्राम सडक योजना अंतर्गत सोलपूर जिल्ह्यातील क्र. ADB-SOL-०९ मधील सांगोला ते केदारवाडी ता. सांगोला इतक्या रकमेस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

- सदर काम ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.
- ज्या कारणाकरिता अधिक्याचा प्रस्ताव क्षेत्रीय स्तरावरून प्राप्त झाला आहे, तो या कामाकरिताच्या मंजुर निविदेमधील सर्व अटी, शर्ती (Terms and Conditions) व तरतूदींच्या अनुषंगानेच आहे, याची खातरजमा करावी.

- कामाची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपद्धती व राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेश अनुसरण्यात यावेत.
- सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही.
- सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.
- या कामावरील खर्च सुधारित अंदाजित खर्चाच्या मर्यादेत ठेवण्यात यावा व त्यापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

**०५.** सदर कामावरील खर्च “मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००) (०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी- ५०५४ ५१५३” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०५१२१५५७२२१७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.05.12 16:49:28 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

**( प्रशांत पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय, मुंबई.
४. मा.विधानसभा सदस्य, मा.विधानपरिषद, सदस्य.
५. अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. जिल्हाधिकारी, सोलापूर.
८. खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय मुंबई-३२.
९. मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
११. अधीक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे विभाग, पुणे.
१२. कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जिल्हा सोलापूर
१३. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, सोलापूर.
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
१६. माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१७. निवड नस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.